आर्थिक वर्ष २०२५-२६
महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान वितरीत करण्याबाबत (अनिवार्य) (२२१५A०४१), ३६, सहायक अनुदाने (वेतन).

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२५/प्र.क्र. ६७/पापु-२३**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
दिनांक : २५ एप्रिल, २०२५.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मजीप्रा-२०१४/प्र.क्र.३३(अ)/पापु-२३, दिनांक २३.०३.२०१७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७ एप्रिल,२०२५.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते तसेच निवृत्तीवेतन यांचे दायित्व शासनाने स्वीकारण्याचा व महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे जमा होणारे ईटीपी चार्जेस व तांत्रिक शुल्क शासनाकडे जमा करण्याचा धोरणात्मक निर्णय मंत्रीमंडळाने दिनांक १६.०३.२०१७ च्या बैठकीमध्ये घेतला असून त्यानुषंगाने संदर्भाधीन दिनांक २३.०३.२०१७ चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा करण्याच्या दृष्टीने अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला अनुदान म्हणून “मागणी क्रमांक - वाय २, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१) आस्थापना (०१)(०४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान, (अनिवार्य/दत्तमत) (२२१५A०४१), ३६, सहायक अनुदाने (वेतन)” या

लेखाशीर्षांतर्गत रुपये २५,०३,३१,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस कोटी तीन लाख एकतीस हजार फक्त) इतकी रक्कम या शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे :-

१) या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या नियमित आस्थापनेवरील कर्मचा-यांच्या सन २०२५-२६ मधील मंजूर व अनुज्ञेय वेतन / भत्त्यासाठी वापरण्यात यावा. वेतन / भत्त्यांच्या यापूर्वीच्या कोणत्याही थकबाकीसाठी या निधीचा वापर करु नये. या निधीचा अन्य बाबींवरील खर्च ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल व अशा कृतीसाठी संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील.

२) सन २०२५-२६ मध्ये प्राधिकरणाकडे जमा होणारे तांत्रिक शुल्क व ईटीपी चार्जेस शासनाकडे त्वरीत जमा करावेत.

३) उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२५ मध्ये वितरीत केलेल्या निधीपैकी प्रत्यक्ष झालेल्या खर्चाचा तपशील उपलब्ध करून द्यावा.

४) वेतन खर्चाकरीता प्राधिकरणाने कस्टमाईज्ड सेवार्थ प्रणाली विकसित केली आहे. संबंधित कर्मचाऱ्यांचे वेतन या कस्टमाईज्ड सेवार्थ प्रणालीच्या माध्यमातून करावे.

२. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेली रक्कम प्राप्त करुन घेण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त), यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तर श्री.रा.म.गेंगजे, उप सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. शासनाद्वारे देण्यात येणारे वेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

४. वितरीत केलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी / शर्तींचे पालन करावे.

५. सदर सहायक अनुदान वेतनासाठी असल्याने वित्त विभागाच्या दिनांक १२.०१.२०२३ च्या शासन निर्णयानुसार ते "बिनशर्त" स्वरुपाचे आहे.

६. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च “मागणी क्रमांक - वाय २, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१) आस्थापना (०१)(०४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन

व भत्त्यापोटी सहायक अनुदान, (अनिवार्य) (२२१५A०४१), ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२५-२६ च्या मंजूर आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

७. वर नमूद केलेल्या लेखाशीर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाचा वेळोवेळी ताळमेळ घेण्यात यावा.

८. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७ एप्रिल, २०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात तसेच बीम्सप्रणालीवर उपलब्ध केलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२५१२५२१९७८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB
B HAJARE

Digitally signed by BALASAHEB B HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT,
2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB B HAJARE
Date: 2025.04.25 15:03:41 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
श्री.रा.म.गेंगजे, उप सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई.
संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण

प्रत: माहितीस्तव,

महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग, व्यय-३/ अर्थसंकल्प-१८ कार्यासन, मंत्रालय, मुंबई.
पापु-४ / पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई.
निवडनस्ती, पापु-२३